**मिरा-भाईंदर महानगरपालिका क्षेत्रातील उद्याने, मैदाने, स्मशाने, दुभाजके इत्यादी ठिकाणांच्या देखभालीकरिता राबविलेली निविदा फेटाळण्याचा तसेच नव्याने निविदा मागविण्याबाबत स्थायी समितीने दि.१७.०८.२०२० रोजी <u>पारीत केलेला ठराव क्र.२७ निलंबित करण्याबाबत</u>.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- मिभाम-११२०/प्र.क्र.४६/नवि-२८**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १८ नोव्हेंबर, २०२०

<u>संदर्भ</u>:-१) मिरा-भाईंदर महानगरपालिका स्थायी समिती सभा ठराव क्र.२७, दि.१७.०८.२०२०.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/वृप्रा/२२९/२०२०-२१, दि.२८.०९.२०२०.

<u>प्रस्तावना</u>:-

मिरा-भाईंदर महानगरपालिकेची उद्याने, स्मशाने, मैदाने, दुभाजके, चौपाट्या, नर्सरी इत्यादीची २ वर्षासाठी देखभाल व दुरुस्ती करण्यासाठी लागणारे साहित्य, सामुग्री व मजूर तसेच सुरक्षा रक्षक पुरवठा करण्यासाठी आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी ई-निविदा प्रक्रिया राबविली. सदर प्रक्रियेअंती न्यूनतम असलेल्या मे.निसर्ग लॅण्डस्केप सर्विसेस या निविदाकाराची निविदा वाटाघाटी करून स्विकारण्याची निविदा समितीने दि.२४.०६.२०२० रोजी शिफारस केली आहे.

सदर निविदा स्थायी समितीच्या मान्यतेस्तव सादर केली असता, समितीने निविदेचे अंदाजपत्रक तयार केले नसल्याचे तसेच महासभा ठराव क्र.२५, दि.०७.०६.२०१९ नुसार निविदा मागविली नसल्याचे कारण देत सदर निविदा फेटाळण्याचा ठराव क्र.२७, दि.१७.०८.२०२० पारीत केला व नव्याने निविदेचे अंदाजपत्रक तयार करून पुन्हा निविदा मागविण्याचे निर्देश दिले.

२. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भाधीन दि.२८.०९.२०२० च्या पत्रात असे नमूद केले आहे की, मा.महासभा ठराव क्र.२५, दि.०७.०६.२०१९ अन्वये खालील कामांची एकत्रित निविदा काढण्याचा ठराव पारीत केला होता. तथापि, सदर मा. महासभेचा ठराव होण्याअगोदर सदर कामामधील काही कामाच्या वार्षिक निविदा सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत काढण्यात आलेल्या होत्या. त्यास मा.स्थायी समितीने वार्षिक निविदांना मंजुरी देण्यात आलेली आहे. त्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**अ)** मा.महासभेच्या ठरावाप्रमाणे निगा व देखभालीचे अंदाजपत्रक तयार करण्यात आलेले आहे. तथापि, सुरक्षा रक्षक पुरवठ्याचे काम आस्थापना विभागामार्फत करण्यात येत असून, सदर कामी मा.महासभेने मुदतवाढ देऊन मंजुरी दिलेली आहे. शौचालय व पाणपोईच्या साफसफाईचा उद्यान व वृक्ष प्राधिकरण विभागाच्या निगा व देखभालीच्या अंदाजपत्रकामध्ये समावेश केलेला आहे. रंगरंगोटी, दुरुस्ती, विद्युत दुरुस्ती इ. कामाकरिता सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत वार्षिक निविदा काढून मा.स्थायी समितीने मंजुरी दिलेली असल्याने निगा व देखभाल अंदाजपत्रकामध्ये समावेश केलेला नाही.

**ब)** सुरक्षा रक्षक आस्थापना विभागामार्फत पुरवठा करण्यात येत असून, मा.महासभा ठराव क्र.१००, दि.०३.११.२०१८ अन्वये महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एसजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, मंत्रालय, मुंबई यांच्या दि.०८.११.२००६ नुसार महानगरपालिकांनी सुरक्षा रक्षकांची आवश्यकता असल्यास सुरक्षा रक्षक मंडळ, बृहन्मुंबई आणि ठाणे जिल्हा यांच्याकडून सुरक्षा रक्षकांची मागणी करण्यात यावी, असे शासन निर्णयात नमूद केल्याचे दिसून येत आहे. त्यानुसार दि.०१.०८.२०१८ पासून ते सुरक्षा रक्षक मंडळ बृहन्मुंबई आणि ठाणे जिल्ह्याकरिता सानपाडा यांचेकडून माहिती येऊन पुढील प्रक्रिया पूर्ण करण्यापर्यंतच्या कालावधीकरिता मे.सैनिक इंटेलिजन्स अँड सेक्युरिटी प्रा.लि. यांना मुदतवाढ देण्यास मा.महासभेने मंजुरी दिलेली आहे. तसेच सुरक्षा रक्षक पुरवठ्याचे कामकाज आस्थापना विभागामार्फत करण्यात येत आहे. त्यानुसार शासनाच्या गाईड लाईन नुसार सुरक्षा रक्षकांची नेमणूक करणे आवश्यक आहे. त्याकरिता निगा व देखभाल अंदाजपत्रकामध्ये सुरक्षा रक्षकाचा समावेश केलेला नाही.

**क)** मा.महासभा ठराव क्र.१४, दि.०७.०६.२०१९ अन्वये लालमाती, शेणखत व सफेद रेती पुरवठा करणे कामाची वार्षिक निविदा मागविण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार उद्याने, मैदाने तसेच वृक्षारोपणाकरिता झाडांच्या मुळाभोवती टाकण्याकरिता लालमातीची आवश्यकता असल्याने सदर कामाची E-Tendering on-line पद्धतीने दि.०२.१२.२०१९ रोजी निविदा मागवून मा.स्थायी समिती सभा ठराव क्र.१४, दि.२६.०६.२०२० अन्वये मान्यता दिलेली आहे.

**ड)** रंगरंगोटी व दुरुस्तीबाबत सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत सदर कामाच्या वार्षिक निविदा मागवून मा.स्थायी समिती सभा ठराव क्र.२१, दि.११.०६.२०१९ मधील अ.क्र.२१ व २५ अन्वये उद्यान, मैदाने, स्मशाने व दुभाजके यांची दुरुस्ती व रंगकाम करणे कामाच्या वार्षिक निविदेस मंजुरी दिलेली आहे. तसेच सन २०२०-२१ करिता मा.महासभा ठराव क्र.०३, दि.१३.०८.२०२० अन्वये उद्याने, मैदाने, स्मशानभुमी, दफनभुमी, दुभाजके यांची वार्षिक मुदतीने देखभाल व दुरुस्तीची कामे करण्याकरिता अंदाजपत्रकास मंजुरी दिलेली आहे. त्यामुळे अंदाजपत्रकामध्ये समावेश करण्यात आलेला नाही.

**इ)** मा.महासभा ठराव क्र.१४, दि.०७.०६.२०१९ अन्वये नवीन खेळणी, बेंचेस, व्यायामाचे साहित्य पुरवठा करून बसविणेकामी वार्षिक निविदा मागविण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार सदर कामाची E-Tendering On-line पद्धतीने दि.२२.०७.२०१९ रोजी निविदा मागवून मा.स्थायी समिती सभा ठराव क्र.१३, दि.२६०६.२०२० अन्वये मान्यता दिलेली आहे. त्यामुळे सदर कामाचा अंदाजपत्रकामध्ये समावेश करण्यात आलेला नाही.

**ई)** सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत स्मशानभूमी व दफनभूमी, उद्याने/तलाव येथील विद्युत कामे देखभाल व दुरुस्ती करण्याकरिता वार्षिक निविदा मागवून मा.स्थायी समिती सभा ठराव क्र.२१, दि.११.०६.२०१९ मधील अ.क्र.१६ व १७ अन्वये विद्युत कामाच्या देखभाल व दुरुस्ती कामाच्या वार्षिक निविदेस मंजुरी दिलेली आहे. त्यामुळे सदर कामाचा अंदाजपत्रकामध्ये समावेश करण्यात आलेला नाही.

त्यामुळे महासभा ठराव क्र.२५, दि.०७.०६.२०२० चे कोणत्याही प्रकारे उल्लघंन झालेले नाही. मिरा-भाईंदर महानगरपालिका स्थायी समिती सभेने दि.१७.०८.२०२० रोजी पारीत केलेला ठराव क्र.२७ हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या

कलम-४५१ अन्वये शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करून विखंडीत करण्याची आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी विनंती केली आहे.

**३.** आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी उक्त ठरावाच्या विखंडनाकरिता नमूद केलेली कारणमिमांसा विचारात घेता, सदर ठराव मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याचे स्पष्ट होत असल्याने, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या स्थायी समिती सभेने पारित केलेला ठराव क्र.२७, दि.१७.०८.२०२० हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (१) अनुसार निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेला ठराव क्र.२७, दि.१७.०८.२०२० हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (१) नुसार निलंबित करण्यात येत आहे. याबाबत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांनी ३० दिवसांत सादर करावे. विहीत मुदतीत अभिवेदन सादर न झाल्यास अधिनियमाच्या कलम-४५१ (३) नुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२०१११८१५२३२७२८२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff, serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2020.11.20 15:54:35 +05'30'

**( नवनाथ रा. वाठ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) महापौर, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
५) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
६) प्रधान सचिव ( नवि-२ ) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवडनस्ती ( नवि-२८ ).